CR-420

<u>निविदा काढण्याबाबत सूचना</u>

**महाराष्ट्र शासन**
ग्रामविकास व जलसंधारण विभाग,
परिपत्रक क्र. झेडपीए २००८/प्र.क्र ४२०/वित्त-९
मंत्रालय मुंबई - ३२, दिनांक १० जून, २००८

**वाचा :-** शासन परिपत्रक क्र. झेडपीए २०००/प्र.क्र २७/३३, दिनांक ५ सप्टेंबर, २०००.

**प्रस्तावना :-** शासनाने ७३ व्या घटना दुरुस्तीनुसार घटनेच्या अनुसूचि ११ मधील विषयांचे जिल्हा परिषदांना हस्तांतरण करण्याबाबत घेतलेल्या निर्णयामुळे जिल्हा परिषदांकडील कामाची व्याप्ती ब-याच प्रमाणात वाढलेली आहे. यास्तव जिल्हा परिषदामध्ये निविदा स्विकृतीची प्रक्रिया जलद होऊन विकास कामे शिघ्रपणे पूर्ण होणे अत्यंत आवश्यक आहे. निविदेच्या संदर्भात सर्व जिल्हा परिषदांना उपरोक्त शासन परिपत्रकान्वये यापुर्वीही सविस्तर सूचना देण्यात आलेल्या आहेत. परंतु पंचायत राज समितीने जिल्हा परिषद सातारा भेटीवर दिनांक १९/१२/२००७ रोजी घेतलेल्या बैठकीमध्ये प्राथमिक आरोग्य केंद्रासाठी तरतूद उपलब्ध असताना विहित मुदतीत निविदा काढण्यात आल्या नाहीत याबाबत नाराजी व्यक्त केलेली आहे. पंचायत राज समितीने या संदर्भात विहित मुदतीत निविदा त्वरीत काढण्याबाबत आदेश निर्गमित करण्याबाबत शिफारस केलेली आहे.

**शासन परिपत्रक :-** आता पंचायत राज समितीने केलेल्या उपरोक्त शिफारसीस अनुसरून सर्व जिल्हा परिषदांना या शासन परिपत्रकान्वये अशा सूचना देण्यात येत आहेत की, जिल्हा परिषदांकडील **ज्या ज्या कामांना प्रशासकीय मान्यता मिळालेली असेल व अशा कामांना अंदाजपत्रकीय मंजूरीसह तरतूद उपलब्ध असेल तर अशा कामांची निविदा त्वरीत काढण्यात याव्यात. याबाबत कोणतीही दिरंगाई करण्यात येऊ नये.**

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने. 200908051300220001

(ना.रा. भागवत)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
सर्व जिल्हा परिषदाचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व जिल्हा परिषदाचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
सर्व विभागीय आयुक्त ( विकास शाखा )
मुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा कोकण भवन, नवी मुंबई
उप मुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा नवी मुंबई,पुणे,नाशिक,औरंगाबाद,नागपूर,अमरावती
सर्व जिल्हा लेखा परिक्षक अधिकारी स्थानिक निधी लेखा
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) / ( लेखा व परिक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) / ( लेखा व परिक्षा ) महाराष्ट्र-२, नागपूर.
या विभागातील सर्व कार्यासने